**बृहन्मुंबईतील घोडागाडी व्यवसायावर अवलंबून**
**असणाऱ्या कुटुंबांचे पुनर्वसन करण्याबाबत**
**मंत्रीमंडळ उपसमिती गठीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : न्यायप्र-१०१५/प्र.क्र.३७९/पोल-८**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ०९ नोव्हेंबर, २०१६

**प्रस्तावना :**

ॲनिमल ॲण्ड बर्ड चॅरिटेबल ट्रस्ट व इतर यांनी बृहन्मुंबई महानगरपालिका व इतर यांच्या विरुध्द मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे जनहित याचिका क्र. ३६/२०११ दाखल केली होती. या अनुषंगाने मा. उच्च न्यायालयाने दिनांक ८ जून, २०१५ रोजी आदेश पारीत केले आहेत. मा. न्यायालयाच्या आदेशांच्या अमंलबजावणीच्या अनुषंगाने बृहन्मुंबईतील घोडागाडी व्यवसायावर अवलंबून असणाऱ्या कुटुंबांचे पुनर्वसन करण्याबाबतचा प्रस्ताव मंत्रीमंडळाच्या समोर फेरविचारार्थ दि.२५.१०.२०१६ रोजी सादर करण्यात आला. यावर मंत्रीमंडळाने चर्चा केली. तथापी, यासंदर्भात सविस्तर व सर्वंकष अभ्यास करुन निर्णय घेणे आवश्यक असल्याने याकरीता मंत्रीमंडळ उपसमिती गठीत करण्याचा निर्णय मंत्रिमंडळाने घेतला आहे.

**शासन निर्णय :**

मा.उच्च न्यायालयाच्या आदेशानुसार बृहन्मुंबईतील घोडागाडीचा व्यवसाय बंद करण्याच्या निर्णयामुळे बाधित होणारे घोडागाडी चालक / मालक यांना प्रकल्पबाधित व्यक्ती म्हणून फेरीवाला परवाने देण्यासंदर्भातील प्रस्तावावर सविस्तर व सर्वंकष अभ्यास करण्यासाठी खालीलप्रमाणे मंत्रिमंडळ उपसमिती गठीत करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १) | श्री. सुधीर मुनगंटीवार, मा.मंत्री (वित्त व नियोजन) | अध्यक्ष |
| २) | श्री. सुभाष देसाई, मा.मंत्री (उद्योग, खनिकर्म) | सदस्य |
| ३) | श्री. विनोद तावडे, मा.मंत्री ( शालेय शिक्षण, उच्च व तंत्रशिक्षण इ.) | सदस्य |
| ४) | श्री. जयकुमार रावल, मा.मंत्री (रो.ह.यो. व पर्यटन) | सदस्य |
| ५) | श्री. महादेव जानकर, मा.मंत्री ( पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय व मत्स्यविकास) | सदस्य |
| ६) | सचिव (पदुम) | सदस्य सचिव |

या मंत्रीमंडळ उपसमितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील.

अ) मा. उच्च न्यायालयाने दि.०८.०६.२०१५ रोजी पारीत केलेल्या निर्णयाप्रमाणे व्हिक्टोरीया बंद करण्यात आल्यानंतर बाधित होणाऱ्या घोडागाडी मालक / चालकांचे पुनर्वसन करण्यासाठी त्यांना महानगरपालिकेमार्फत फेरीवाले परवाने देणे याचा अभ्यास करणे

ब) तसेच इतर संलग्न बाबींवर विचार करणे व अहवाल देणे

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१६११०९१७१८१२७९२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Yuvraj B Ajetrao

Digitally signed by Yuvraj B Ajetrao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=68e6425b3accbc2689913c8cbb128d17b6b5411a5b0ad04137df39fe6ab84da7, cn=Yuvraj B Ajetrao
Date: 2016.11.09 17:21:45 +05'30'

**( युवराज ब. अजेटराव )**
उप सचिव
गृह विभाग, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मंत्रिमंडळ उपसमितीचे अध्यक्ष / सदस्य (पत्राने)
२. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
३. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
४. अपर मुख्य सचिव (परिवहन), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव, (पशुसंवर्धन), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
६. सचिव, (न.वि.-२) नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
७. आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई
८. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई
९. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१०.सह पोलीस आयुक्त (वाहतूक), वरळी, मुंबई
११.जिल्हाधिकारी, मुंबई शहर
१२.प्रतिनिधी, पीपल्स फॉर ॲनिमल (स्वयंसेवी संघटना)
१३.प्रतिनिधी, पेटा (स्वयंसेवी संघटना)
१४.निवड नस्ती (पोल-८).